महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिम
प्रसिध्दीसाठी वृत्तपत्राच्या बातमीदारांना
पुरस्कार सन २००८-२००९ तसेच ग्रामपंचायतींना
लेखन सामुग्री खरेदी करण्यासाठी सन २००९-१०
चा निधी उपलब्ध करुन देण्यासंबंधी.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक-तंमुगा १००९/प्र.क्र.८७/२००९/पोल-१५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक - २९ जानेवारी, २०११.

**वाचा :** - १) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-तंमुगा १००८/सीआर ४३/२००८/पोल-१५,
दिनांक १४ ऑगस्ट, २००८

२) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-तंमुगा १००९/सीआर ८७/२००९/पोल-१५,
दिनांक २६ फेब्रुवारी, २०१०

३) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-तंमुगा १००९/प्र.क्र.३६/२००९/पोल-१५,
दिनांक १९ ऑगस्ट, २००९

४) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयाचे पत्र क्र-पोमसं/४०/९०६९/मगांतंमुगा/
३४/०९, दिनांक २२/१०/२०१०.

**शासन निर्णय** - महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिम अधिक सक्षमपणे राबविण्यासाठी ग्रामपंचायतींना बैठकांचे आयोजन करणे, विविध प्रकारच्या नोंदवहया व लेखन सामग्रीची खरेदी करणे शक्य व्हावे यासाठी क्र.२ येथील आदेशान्वये सन २००९-१० या वर्षासाठी निधी उपलब्ध करुन देण्यात आला होता. तथापि, पोलीस अधिक्षक, भंडारा, जळगांव व वाशिम जिल्हा कार्यालयांना विविध प्रशासकीय अडचणींमुळे दिनांक ३१ मार्च, २०१० पूर्वी कोषागारातून निधी आहरीत करणे शक्य झाले नाही. परिणामी सदरचा निधी व्यपगत झाला आहे. त्यामुळे यासाठी पुन्हा निधी मंजूर करुन उपलब्ध करुन देण्याची विनंती पोलीस अधिक्षक कार्यालयांनी केल्याने पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भीत क्र.(४) येथील पत्रान्वये प्रस्ताव शासनाला सदर केला होता.

२. पोलीस महासंचालक कार्यालयाने सादर केलेला प्रस्ताव लक्षात घेऊन या आदेशान्वये खालीलप्रमाणे रु.२५,०६,०००/- (रुपये पंचवीस लाख सहा हजार फक्त) इतका निधी संबंधित जिल्हयांपुढे दाखविल्याप्रमाणे मंजूर करुन उपलब्ध करुन देण्यात येत आहे :-

| अ.क्र | जिल्हयाचे नांव | विषय | रक्कम |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | पोलीस अधिक्षक, वाशिम | (१) प्रसिध्दीसाठी वृत्तपत्राच्या बातमीदारांना सन २००८-०९ मध्ये मंजूर केलेली परंतु व्यपगत झालेली रक्कम पुन्हा मंजूर करुन उपलब्ध करणे. | १,४०,०००/- |
| | | (२) महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिमेच्या सन २००९-१० या वर्षाच्या ग्रामपंचायतींना तंटामुक्त गांव समितीच्या बैठका आयोजित करणे आणि विविध प्रकारच्या नोंदवहया व लेखनसामग्री खरेदी करण्यासाठी मंजूर केलेली परंतु व्यपगत झालेला निधी पुन्हा मंजूर करुन उपलब्ध करणे. | ५,०९,०००/- |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | पोलीस अधिक्षक, भंडारा | महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिमेच्या सन २००९-१० करीता ग्रामपंचायतीच्या बैठका आयोजित करणे आणि विविध प्रकारच्या नोंदवहया व लेखन सामग्री खरेदी करण्यासाठी मंजूर केलेला परंतु व्यपगत झालेला निधी पुन्हा मंजूर करुन उपलब्ध करुन देणे. | ५,७२,०००/- |
| ३ | पोलीस अधिक्षक, जळगांव | महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिमेच्या सन २००९-१० करीता ग्रामपंचायतींना बैठका आयोजित करणे आणि विविध प्रकारच्या नोंदवहया व लेखनसामग्री खरेदी करण्यासाठी मंजूर केलेला परंतु व्यपगत झालेला निधी पुन्हा मंजूर करुन उपलब्ध करणे. | १२,८५,०००/- |
| | | (रु.पंचवीस लाख सहा हजार फक्त) रुपये | २५,०६,०००/- |

३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उक्त तरतूदीचे जिल्हानिहाय वाटप तात्काळ करावे. संबंधित जिल्हयाचे पोलीस अधिक्षक यांनी त्यांच्या जिल्हयातील ग्रामपंचायतींना लोकसंख्येच्या प्रकरणात देय तरतुदीचे वाटप करावे. पोलीस अधिक्षक, वाशिम यांनी वाशिम जिल्हयातील बातमीदारांच्या पुरस्काराची रक्कम धनादेशाद्वारे वितरीत करावी.

४. यासाठी होणारा खर्च रु.२५,०६,०००/- (रुपये पंचवीस लाख सहा हजार फक्त) मागणी क्रमांक बी-१, प्रधानलेखाशिर्ष २०५५ पोलीस, (००) (१०) तंटामुक्त गांव मोहिम (२०५५०५३३), ३१ सहायक अनुदान (योजनेतर/दत्तमत) याखालील चालू वित्तिय वर्ष सन २०१०-११ या वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०१३११५४४४४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( वि.फ.वसावे)**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,
महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग, व्यय-७, अर्थ-२, अर्थ-११, मंत्रालय, मुंबई,
विभागीय आयुक्त, नाशिक, नागपूर व अमरावती,
विशेष पोलीस महानिरीक्षक, नाशिक, नागपूर व अमरावती परिक्षेत्र,
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक, नागपूर व अमरावती,
जिल्हाधिकारी, नाशिक, नागपूर व अमरावती परिक्षेत्र,
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक, नागपूर व अमरावती,
पोलीस अधिक्षक, नाशिक (ग्रा), नागपूर (ग्रा) व अमरावती (ग्रा)
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक, नागपूर व अमरावती,
निवडनस्ती /पोल-१५.